**ग्रामीण रुग्णालय तेर, जि. उस्मानाबाद येथील मुख्य इमारत व निवासस्थान दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता व अनुदान उपलब्धतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१६/ प्र.क्र.९०/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
**तारीख: २७ जानेवारी, २०१७.**

वाचा

**१) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राजयस्तर),मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ कक्ष-३/ टे-६/ग्रारुतेरमुइवनिवादुरु/१२११७-१८/१३, दि.१०.०८.२०१६.**

**प्रस्तावना**

ग्रामीण रुग्णालय तेर, जि. उस्मानाबाद येथील मुख्य इमारत व निवासस्थान दुरुस्तीच्या कामांची एकूण रु.१४,९२,४७९/- इतक्या किंमतीची ५ अंदाजपत्रके शासनास प्राप्त झाली. सदर अंदाजपत्रके व आराखडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद यांनी प्रमाणित केलेली आहेत. तसेच सन २०१५-१६ च्या दरसुचिवर आधारीत आहेत.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये ग्रामीण रुग्णालय तेर, जि. उस्मानाबाद येथील मुख्य इमारत व निवासस्थान दुरुस्तीचे अंदाजपत्रकास खालीलप्रमाणे सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात होणाऱ्या रु.१४,९२,४७९/- इतक्या किंमतीचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी मिळणेबाबतच्या खर्चास शासनाची प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजे रक्कम रु. |
|---|---|---|
| १. | ग्रामीण रुग्णालय, तेर येथील इमारतीची दुरुस्ती करणे (अधिक्षक कक्ष, परिचारिका कक्ष व इतर कार्यालयीन कक्षाची दुरुस्ती) | २,९९,७३३/- |
| २. | ग्रामीण रुग्णालय, तेर येथील इमारतीची दुरुस्ती करणे (पूर्व बाजू) | १,९८,०००/- |
| ३. | ग्रामीण रुग्णालय, तेर येथील इमारतीची दुरुस्ती करणे (दक्षिण बाजू) | २,९९,७४६/- |
| ४. | ग्रामीण रुग्णालय, तेर येथील परिसराती निवासस्थानाची दुरुस्ती करणे | ३,००,०००/- |
| ५. | ग्रामीण रुग्णालय, तेर येथील इमारतीची दुरुस्ती करणे | २,९५,०००/- |
| | एकूण | १४,९२,४७९/- |

अंदाजपत्रके रु.२० लक्षपेक्षा कमी रकमेची असल्याने वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंर्भात निर्गमित करण्यात आलेल्या शा.नि.क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम भाग-२, दि.१७.०४.२०१५ च्या शासन निर्णयातील भाग एक उपविभाग-५ अ.क्र.३ व सार्वजनिक बांधकाम विभाग नियतपुस्तिकेतील परि. क्र.१३४ नुसार किरकोळ नागरी बांधकामांना स्थापत्य रु.२० लाख रकमेपर्यतच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०१२७१३२१४१२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2017.01.27 16:05:34 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा ( लातूर मंडळ ), लातूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, उस्मानाबाद
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
१०. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (आरोग्य-३ ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).